**तूर उत्पादक शेतकऱ्यांना सहाय्य करण्यासाठी नाफेडच्यावतीने Price Support Scheme (PSS) अंतर्गत तुर खरेदी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सपस-२०१७/प्र.क्र.७७ /२४- स**
मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२
दिनांक:- १६ मे, २०१७

<u>संदर्भ</u> :-(१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग क्र.सपस-२०१७/ प्र.क्र.७७/२४-स, दिनांक २७.०४.२०१७.
(२) कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग,भारत सरकार,नवी दिल्ली,यांचे पत्र क्रमांक एफ नं एल-१५०१६/९५/२०१६,एमपीएन, दिनांक ८ मे,२०१७.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधिन क्र.१ येथील दिनांक २७ एप्रिल,२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार, बाजार हस्तक्षेप योजनेअंतर्गत राज्य शासनाच्यावतीने तुर खरेदी करण्याचा निर्णय घेण्यात आला होता. मात्र, आता संदर्भाधिन क्र.२ येथील पत्रान्वये केंद्र शासनाने नाफेडच्या वतीने PSS अंतर्गत १ लाख मे.टन तूर दिनांक ३१ मे,२०१७ रोजी पर्यत खरेदी करण्यास मान्यता दिली आहे. त्यामुळे, राज्य शासनाची बाजार हस्तक्षेप योजनेअंतर्गत दि.२७.०४.२०१७ च्या शासन निर्णयानुसार सुरु करण्यात आलेली तूर खरेदी बंद करण्यात येत आहे. PSS अंतर्गत १ लाख मे. टन तूरीच्या खरेदीसंदर्भात खालीलप्रमाणे स्पष्टीकरण करण्यात येत आहे:-

(अ) खरेदी केद्रांवर शिल्लक असलेली तुर व तुरीची अपेक्षित आवक विचारात घेऊन दररोज किती प्रमाणात तुरीची खरेदी होऊ शकते याचा अंदाज घेऊन, त्याप्रमाणात शेतक-यांकडून घोषणापत्र ज्यात, संबंधित शेतक-याचा ७/१२उतारा, पीक पेरा, आधार कार्ड, यावर्षी यापूर्वी तुर विकली असल्यास बाजारसमितीचे नांव, किती किलो/ क्विंटल तुर विकली याची माहिती, भ्रमणध्वनी व बँक खात्याचा तपशील इ. कागदपत्रांचा समावेश असेल. ही कागदपत्रे घेतल्यानंतर टोकन वितरीत करण्यात यावे. टोकनसाठी सादर केलेली कागदपत्रे, दररोज संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडे पाठवून घोषणापत्रात दिलेल्या माहितीची खातरजमा करुन घ्यावी. अशा प्रकारची कार्यपध्दत यापूर्वीच जालना व उस्मानाबाद अवलंबिली जात आहे. तशीच कार्यपध्दत सर्व जिल्हयांनी अवलंबावी. घोषणापत्रातील माहितीची जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत खातरजमा करुन घेतल्यानंतर, टोकन नंबरप्रमाणे, ज्या शेतक-याची तुर खरेदी करण्याचा क्रम असेल , त्या शेतक-याला आदल्या दिवशी दुपारपूर्वी, भ्रमणध्वनीवर संपर्क साधुन खरेदी केंद्रावर तुर घेऊन येण्यास कळविण्यात यावे.

तसेच हवामान खात्याच्या अंदाजानुसार चालु वर्षी मान्सुनचे आगमन वेळेवर होण्याची शक्यता आहे. त्यामुळे दररोज तुरीची जास्तीत जास्त खरेदी होईल याद्दष्टीने सर्व खरेदी केद्रांवर वजन काटे वाढविणे, आवश्यक मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे इ. याबाबत योग्य ती व्यवस्था करुन दक्षता घ्यावी. या संदर्भातील सूचना संबधित जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांनी त्यांच्या नियंत्रणाखालील सर्व कृषि उत्पन्न बाजार समित्यांनादयाव्यात.

(ब) केंद्र शासनाने PSS योजनेअंतर्गत, नाफेडच्या वतीने खरेदी करण्यास १ लाख मे.टन तुर खरेदी दि.३१.०५.२०१७ पर्यंत करण्याची मुदत दिली आहे. त्यामुळे, या मर्यादत व कालावधीत तुरी खरेदी करण्याबाबत महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ व विदर्भ पणन महासंघ आणि आदिवासी विकास महामंडळ या संस्थाशी व खालील परि (क) प्रमाणे गठित केल्याप्रमाणे, विभागीय स्तरावरील संनियंत्रण समितीशी समन्वय साधण्याची जबाबदारी पणन संचालक महाराष्ट्र राज्य पुणे यांची राहील.

(क) नाफेडच्या वतीने करावयाची १ लाख मे. टन या मर्यादेत दिनांक ३१ मे,२०१७ पर्यत तुर खरेदी करण्याची मुदत आहे. मात्र, १ लाख मे. टन तुर खरेदी होण्याच्या सुमारास, खरेदी केंद्रावर त्यांनतरही तुर शिल्लक राहणार असेल किंवा तुर खरेदी सुरु करण्याची मागणी असल्यास, तुरीची खरेदी केंद्रावरील अपेक्षित आवक विचारात घेऊन, पुन्हा आणखी तुर खरेदी करण्याचे मर्यादा वाढवून देण्याची विनंती केंद्र शासनास करण्याचा राज्य शासनाचा मनोदय आहे. त्यामुळे PSS अंतर्गत १ लाख मे.टन तूर खरेदी पैकी ०.९० लाख मे.टन (९० लाख क्विंटल) च्या जवळपास खरेदी झाल्याबरोबर, केंद्र शासनास विनंती करावी लागणार असल्यामुळे याबाबतचे संनियंत्रण वरिष्ठ स्तरावर ठेवणे आवश्यक आहे. त्यामुळे यांसदर्भात सर्व खरेदी संस्थांवर संनियंत्रण ठेवण्यासाठी महसुल विभागीय स्तरावर खालील प्रमाणे संनियत्रण समिती स्थापन करण्यात येत आहे:-

| | |
|---|---|
| i) महसुल विभागीय आयुक्त - | अध्यक्ष |
| ii) संबंधित विभागीय सहकारी निबंधक सहकारी संस्था - | सदस्य |
| iii) संबंधित जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था- | सदस्य |
| iv) संबंधित सहाय्यक निबंधक सहकारी संस्था- | सदस्य |
| v) संबंधित सचिव कृषि उत्पन्न बाजार समिती- | सदस्य |
| vi) संबंधित जिल्हा पणन अधिकारी- | सदस्य सचिव |

(ड) विभागीय संनियंत्रण समितीने प्रत्येक दिवशी सायंकाळी तूर खरेदीचा आढावा घेऊन त्याप्रमाणे पुढील दिवसाच्या तुर खरेदीबाबत उपाययोजना करावी. तसेच महसुल विभागाचा प्रत्येक दिवसाचा अहवाल, दुस-या दिवशी कोणत्याही परिस्थितीत सकाळी ११.०० वाजेपर्यंत, पणन संचालक, महाराष्ट्र राज्य पुणे व उपसचिव (पणन), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना (dirmktms@gmail.com, व kalu.valvi@nic.in व ashok.padave@nic.in) या ई-मेल वर निश्चितपणे पाठवावा.

(इ) कृषि उत्पन्न बाजार समिती स्तरावर स्थापन करण्यात आलेल्या संनियंत्रण समिती मार्फत खरेदी केंद्रावरील व्यवहारावर देखरेख करण्यात यावी.

(२) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१७१६१०३५९८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Valvi Kalu Gonya

Digitally signed by Valvi Kalu Gonya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op,Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92ee de8c323934f82edb538d3b20, cn=Valvi Kalu Gonya
Date: 2017.05.17 16:14:32 +05'30'

**( का.गो.वळवी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा. मंत्री व माराज्यमंत्री, महाराय्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई
६. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७. सर्व महसुल विभागीय आयुक्त,
८. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११.कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
१२.सर्व तहसिलदार,
१३.सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
१४.सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
१५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या. मुंबई
१६.अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ.पुणे
१७. व्यवस्थापकीय संचालक, दि विदर्भ सहकारी पणन महासंघ मर्या. नागपूर
१८. व्यवस्थापकीय संचालक, आदिवासी विकास महामंडळ, नाशिक

१९. अध्यक्ष, कृषी उत्पन्न बाजार समिती(सर्व)
२०. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
२१. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
२३. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
२४. कार्यासन अधिकारी, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.